सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम / स्वायत्त संस्था / स्थानिक संस्था यामध्ये स्वत:ला सामावून घेतल्यानंतर एकरकमी ठोक रक्कम स्विकारलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांचे उर्वरित २/३ निवृत्तिवेतन पुन:स्थापित करणे व त्यांचे निवृत्तिवेतन सातव्या वेतन आयोगानुसार सुधारीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सेनिवे-२०१९/प्र.क्र.१४४/सेवा-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०२ मार्च, २०२०.

**संदर्भ** : १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : निअंक-१०८६/१७७१/सेवा-४, दि.३०.०५.१९८८.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : निअंक-१०९७/१२/सेवा-४, दि.२६.०५.१९९७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : निअंक-१०९९/३०६/सेवा-४, दि.१५.११.१९९९.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : निअंक-१०१०/प्र.क्र.५८/सेवा-४, दि.२६.०७.२०१०.
५) केंद्र शासनाचे Pension & Pensioners Welfare विभागाचा क्रमांक : No.४/३४/२००२-P&PW(D).Vol. II, दि.२३.०६.२०१७ चे कार्यालयीन ज्ञापन.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे-२०१९/प्र.क्र.५८/सेवा-४, दि.२४.०१.२०१९.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील नियम ६७ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांनी सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम / स्वायत्त संस्था / स्थानिक संस्था यामध्ये स्वत:ला सामावून घेतल्यानंतर त्यांना नियमित निवृत्तिवेतन किंवा निवृत्तिवेतनाऐवजी एकरकमी ठोक रक्कम स्वीकारण्याबाबत विकल्प देण्याची तरतूद आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये अशा कर्मचाऱ्यांच्या बाबतीत निवृत्तिवेतनाऐवजी ठोक रक्कमेचे अंशराशीकरण स्विकारलेल्या दिनांकापासून १५ वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर त्यांच्या निवृत्तिवेतनाचा १/३ अंशराशीकृत भाग पुन:स्थापित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

आता केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक ५ येथील ज्ञापनान्वये सार्वजनिक उपक्रमात समावेशित केंद्रीय कर्मचाऱ्यांना त्यांनी ठोक रक्कम स्विकारल्याच्या तारखेस १५ वर्ष पूर्ण झाल्याच्या दिनांकास निवृत्तिवेतनाचा उर्वरित २/३ भाग पुन:स्थापित करण्याचा निर्णय घेतला आहे. तसेच निवृत्तिवेतनाचा २/३ भाग पुन:स्थापित केल्याच्या दिनांकापासून थकबाकीदेखील अनुज्ञेय केली आहे. त्याच धर्तीवर राज्य शासनाच्या सेवेतील सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम / स्वायत्त संस्था / स्थानिक संस्था यामध्ये स्वत:ला सामावून घेतल्यानंतर एकरकमी ठोक रक्कम स्विकारलेली आहे अशा कर्मचाऱ्यांच्या निवृत्तिवेतनाचा उर्वरित २/३ भाग पुन:स्थापित करण्याची तसेच त्यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित निवृत्तीवेतनाचा लाभ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्य शासकीय सेवेतील ज्या कर्मचाऱ्यांचे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम / स्वायत्त संस्था / स्थानिक संस्था यामध्ये समावेशन झालेले आहे व सध्या त्यांना मूळ निवृत्तिवेतनाच्या १/३ रक्कम अधिक संपूर्ण मूळ निवृत्तिवेतनावरील महागाई भत्ता याप्रमाणे निवृत्तिवेतन प्रदान करण्यात येत आहे, अशा निवृत्तिवेतनधारकांना त्यांच्या मूळ निवृत्तिवेतनाच्या उर्वरित २/३ रकमेचे पुन:स्थापन करण्याचा लाभ अनुज्ञेय करण्यात येत आहे. सदरचा लाभ दि.१ एप्रिल १९८५ किंवा अंशराशीकरणाची ठोक रक्कम प्राप्त झाल्याच्या तारखेस १५ वर्षे पूर्ण झाल्याची तारीख यापैकी जी तारीख नंतरची असेल त्या तारखेपासून रोखीने देय करण्यात येईल.

२. याकरिता निवृत्तिवेतनधारक / कुटुंब निवृत्तिवेतनधारक अथवा ते हयात नसल्यास त्यांच्या वारसांनी सोबत जोडलेल्या उचित नमुन्यात संबंधित कोषागार अधिकारी / अधिदान व लेखा अधिकारी यांच्याकडे आवश्यक कागदपत्रांसह अर्ज करावा.

३. सदर निवृत्तिवेतनधारकांच्या २/३ भागाचे पुन:स्थापन महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई किंवा महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर यांच्या प्राधिकारपत्राशिवाय करण्याकरिता व एकत्रित दराने निवृत्तिवेतनाचे प्रदान करण्यासाठी, सर्व निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकारी म्हणजेच यथास्थिती, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / कोषागार अधिकारी यांना याद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे. तथापि, कोषागार कार्यालयाकडील निवृत्तिवेतन प्रदान आदेशात निवृत्तिवेतननिश्चितीच्या दृष्टीने आवश्यक माहिती उपलब्ध नसल्यास त्यांनी ती महालेखापाल कार्यालयाकडून प्राप्त करुन घ्यावी.

४. निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकारी यांनी पुन:स्थापित केलेल्या रकमेची पडताळणी करण्याच्यादृष्टीने प्रत्येक निवृत्तिवेतनाच्या प्रकरणाचा संपूर्ण तपशील ज्या लेखा अधिकाऱ्याने निवृत्तिवेतन प्रदान आदेश काढलेले आहेत त्यांच्याकडे संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयासोबतच्या जोडपत्र-दोन मध्ये पाठवावी.

५. ज्या प्रकरणी निवृत्तिवेतनधारक दि.१ एप्रिल १९८५ किंवा अंशराशीकरणाची ठोक रक्कम प्राप्त झाल्याच्या तारखेस १५ वर्षे पूर्ण झाल्याच्या तारखेस हयात असेल व त्यानंतर मृत्यू पावला असेल अशा प्रकरणी त्याचे कायदेशीर वारसदार निवृत्तिवेतनधारकाच्या मृत्युच्या दिनांकापर्यंतची हयातकालीन थकबाकी मिळण्यास पात्र ठरेल / ठरतील. यासाठी कायदेशीर वारसदारांनी यथास्थिती, निवृत्तिवेतन संवितरण / मंजूर प्राधिकाऱ्याकडे म्हणजे अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / कोषागार अधिकारी / विभाग / कार्यालय प्रमुखाकडे अर्ज करावा. हयातकालीन थकबाकीची रक्कम अनुज्ञेय असल्यास त्यातून प्रलंबित वसुलीच्या रकमा असल्यास त्या समायोजित करुन एकाच हप्त्यात त्यांच्या कायदेशीर वारसास रोखीने अदा करण्यात यावी.

६. नियमानुसार आयकर कपातीची कार्यवाही निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकारी म्हणजेच अधिदान व लेखा अधिकारी / कोषागार अधिकारी यांनी करावी.

**निवृत्तिवेतन सातवा वेतन आयोगानुसार सुधारणा**

७. संदर्भाधीन क्र.६ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनातील निवृत्तिवेतनधारकांचे निवृत्तिवेतन दि.१.१.२०१६ पासून सातव्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारित करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेवून सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम/स्वायत्त संस्था इत्यादींमध्ये समावेशन झालेल्या व आता संपूर्ण निवृत्तिवेतनाचा लाभ अनुज्ञेय केलेल्या निवृत्तिवेतनधारकांचे निवृत्तिवेतन सातव्या वेतन आयोगानुसार सुधारीत करण्यात यावे. निवृत्तिवेतन सुधारीत करताना संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयातील सर्व तरतुदींचे पालन करण्यात यावे.

८. यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदात नमूद केलेल्या निवृत्तिवेतनधारकांची निवृत्तिवेतने ज्या अर्थसंकल्पीय शीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०२१३०६११५२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: CN = INDRAJEET SAMBHAJI GORE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = FINANCE DEPUTY SECRETARY
Date: 2020.03.02 13:15:53 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उप सचिव.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.
१०) सह संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
११) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / ठाणे / अमरावती.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.

१५) राज्यपालांचे सचिव.

१६) मुख्यमंत्र्यांचे सचिव.

१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव.

१८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

१९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.

२०) मंत्रालयातील सर्व विभाग.

२१) निवड नस्ती.

(**निवृत्तिवेतन धारकांनी कोषागारात सादर करावयाच्या अर्जाचा नमुना**)

नाव -----------------------------

पत्ता -----------------------------

---------------------------------

दूरध्वनी क्रमांक --------------------

दिनांक --------------------------

प्रति,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / कोषागार अधिकारी,

---------------------------------------

विषय : सरकारी क्षेत्रातील उपक्रमामध्ये / स्वायत्त संस्थामध्ये / स्थानिक संस्थामध्ये स्वतःला सामावून घेतलेल्या निवृत्तिवेतनधारकाच्या बाबतीत निवृत्तिवेतनाचा उर्वरित २/३ भाग पुनःस्थापित करण्याबाबत.

संदर्भ : वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : सेनिवे-२०१९/प्र.क्र.१४४/सेवा-४, दि.२.३.२०२०.

मी श्री / श्रीमती ----------------------------------निवृत्तिवेतन प्रदान आदेश क्रमांक -------------------------------- अन्वये कोषागार कार्यालय --------------------- येथून निवृत्तिवेतन घेत आहे. उपरोक्त संदर्भांकित शासन निर्णयानुसार माझे २/३ निवृत्तिवेतनाचा भाग पुनःस्थापित करण्यात यावा, अशी विनंती करीत आहे.

सोबत : १) आधार कार्डची छायांकित प्रत.

२) पॅनकार्डची छायांकित प्रत.

३) फॉर्म ४२-अ (नामनिर्देशन).

४) निवृत्तिवेतन प्रदान आदेशाची छायांकित प्रत.

स्वाक्षरी

(नाव)

**(निवृत्तिवेतन / कुटुंब निवृत्तिवेतनधारक हयात नसल्यास कायदेशीर वारसाने सादर करावयाचा अर्जाचा नमुना)**

नाव ----------------------------

पत्ता ----------------------------

---------------------------------

दूरध्वनी क्रमांक --------------------

दिनांक --------------------------

प्रति,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / कोषागार अधिकारी,

---------------------------------------

विषय : सरकारी क्षेत्रातील उपक्रमामध्ये / स्वायत्त संस्थामध्ये / स्थानिक संस्थामध्ये स्वतःला सामावून घेतलेल्या निवृत्तिवेतनधारकाच्या बाबतीत निवृत्तिवेतनाचा उर्वरित २/३ भाग पुनःस्थापित करण्याबाबत.

संदर्भ : वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : सेनिवे-२०१९/प्र.क्र.१४४/सेवा-४, दि.२.३.२०२०.

मी श्री / श्रीमती ----------------------------------, माझे (वडील / आई) श्री/श्रीमती -------------------------------------- निवृत्तिवेतन प्रदान आदेश कमांक ------------- ----------------- अन्वये कोषागार कार्यालय --------------------- येथून निवृत्तिवेतन घेत होते. उपरोक्त संदर्भांकित शासन निर्णयानुसार त्यांचे निवृत्तिवेतनातील अंशराशीकरणाचा भाग पुनःस्थापित करण्यात यावा व देय असलेली थकबाकी मला अदा करण्यात यावी, अशी विनंती करीत आहे.

सोबत : १) आधार कार्डची छायांकित प्रत.

२) पॅनकार्डची छायांकित प्रत.

३) कायदेशीर वारसाबाबतचे प्रमाणपत्र तसेच कोषागारास प्रदानासाठी आवश्यक असलेली कागदपत्र.

४) निवृत्तिवेतन प्रदान आदेशाची छायांकित प्रत.

स्वाक्षरी

(नाव)

**Restoration of 2/3rd commuted portion of pension in respect of the State Government employees who had drawn lump sum amount on their absorption in Public Sector Undertaking / Autonomous Body /Local Body and revision of pension as per Seventh Pay Commission.**

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Finance Department**
**Government Resolution No. : PEN- 2019/C.R. 144/SER -4**
Hutatma Rajguru Chowk, Madam Cama Marg,
Mantralaya, Mumbai- 400032.
Date : 2 March 2020.

**Reference :**
1) Government Resolution, Finance Department No. COP-10867/1771/ SER-4 dated 30.05.1988.
2) Government Resolution, Finance Department No. COP-1097/12/ SER-4 dated 26.05.1997.
3) Government Resolution, Finance Department No. COP-1099/ 306/ SER-4 dated 15.11.1999.
4) Government Resolution, Finance Department No.COP-1010/C.R. 58/ SER-4 dated 26/07/2010.
5) Government of India, Ministry of Personnel, Public Grievances & Pension Office Memorandum No.4/34/2002-P&PW (D).Vol. II dated 23.06.2017.
6) Government Resolution, Finance Department No.PEN-2019/C.R. 58/ SER-4 dated 24/01/2019.

**Preface**:

As per rule 67 of Maharashtra Civil Service (Pension) Rules 1982, state government employee can exercise an option of getting regular pension or a lump sum amount in lieu of pension after getting absorbed in Public Sector Undertaking / Autonomous Body /Local Body. As per Government Resolution mentioned in Reference No.2 above, decision has been taken to restore one-third commuted part of pension for such employees after completion of 15 years from the date of commutation.

As per Memorandum in Reference No.5 above, Central Government has taken decision to restore 2/3 part of the pension of central government employees absorbed in Public Sector Undertaking from the date of completing 15 years of the receipt of the lump sum amount. Arrears from the date of restoration of 2/3 part of pension is also made permissible. On the same lines, the issue of restoration of 2/3 part of pension and revision of pension as per seventh pay commission in respect to state government employees who got absorbed in Public Sector Undertaking / Autonomous Body /Local Body and opted for a lump sum amount, was under consideration of government.

**Government Resolution:**

The State government employees who got absorbed in Public Sector Undertaking / Autonomous Body /Local Body and at present getting 1/3 of basic pension plus dearness relief on entire amount of basic pension are entitled to get the benefit of restoration of remaining 2/3 part of pension. The said benefit will be made payable in cash from 1st April 1985 or on completion of 15 years of the receipt of lump sum amount, whichever is later.

2. For this purpose, pensioner / family pensioner or if he / she is not alive, their legal heir / heirs should apply to the concerned Pension Disbursing Authority in the proper form attached herewith, along with relevant documents.

3. All Pension Disbursing Authorities i.e. the Pay and Accounts Officer Mumbai / Treasury Officer, as the case may be, are hereby authorized to make restoration of 2/3 part of Pension and pension payment at the consolidated rates to the existing pensioners without any further authorization from the Accountant General (A&E)-I, Maharashtra, Mumbai or Accountant General (A&E)-II, Maharashtra, Nagpur as the case may be. In case where required information in terms of pension consolidation is not available in the Pension Payment Order, Pension Disbursement Authorities may collect such necessary information from Accountant General Office.

4. The Pension Disbursing Authority shall intimate to the Accounts Officer, who had issued the pension payment order, the full particulars of each pension case along with the amount of pension restored for verifying its correctness in Annexure-II of government resolution mentioned in reference no.1.

5. In cases where the pensioner / family pensioner was alive as on 1st April 1985 or on the date of completing 15 years of the receipt of lump sum amount and subsequently died, his legal heir / heirs is / are entitled for Life Time Arrears of pension / family pension till the death of pensioner / family pensioner. For this purpose legal heir / heirs of pensioner / family pensioner may apply to Pension Disbursing / Sanctioning Authorities i.e. the Pay and Accounts Officer, Mumbai / Treasury Officer / Head of Department / Office, as the case may be. Further the Life Time Arrears of pension / family pension are to be paid to the legal heir / heirs, in one instalment in cash after adjustment of recovery amount, if any.

6. Pension Disbursing Authorities means the Pay and Accounts Officer/ Treasury Officer as the case may be, will be solely responsible for deduction of Income Tax as per rule, wherever necessary.

**Revision of Pension as per Seventh Pay Commission**

7. As per Government Resolution in reference No.6, pension of state government pensioners have been revised as per seventh pay commission from 01.01.2016. Provision of

the said Government Resolution will be made applicable to the pensioners who got absorbed in Public Sector Undertaking / Autonomous Body /Local Body and full pension is now made permissible.

8. The expenditure on this account should be debited to the Budget Heads to which the pensions of the pensioners mentioned in the above paras are debited and should be met from the grants sanctioned thereunder.

9. This Government Resolutions is available on the website of Government of Maharashtra i.e. www.maharashtra.gov.in and its computer code number is 202003021306115205. This order has been signed digitally.

By order and in the name of Governor of Maharashtra.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: CN = INDRAJEET SAMBHAJI GORE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = FINANCE DEPUTY SECRETARY
Date: 2020.03.02 13:16:38 +05'30'

**(Indrajeet Gore)**
**Deputy Secretary to Government.**